**श्री. निलेश वामन मदाने, सहाय्यक विद्युत निरीक्षक (गट-अ/राजपत्रित) यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुविनि-२०१६/प्र.क्र. १०८/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१६.

वाचा :- १. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. जीएबी-२०१२/प्र.क्र. १८/का.सेवा-२, दि. २९/०८/२०१२.
२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांचे पत्र क्र. मुविनि/मु.लि./१३९४/२०१६/१७ दि.०५/०८/२०१६.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये श्री. निलेश वामन मदाने यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून सहाय्यक विद्युत निरीक्षक (वेतनसंरचना रु. १५,६००-३९,१००+ग्रेड पे रु. ५,४००) पदावर सरळसेवेने दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीकरिता नियुक्ती करण्यात आलेली आहे.

मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये श्री. निलेश वामन मदाने, सहाय्यक विद्युत निरीक्षक यांचा २ वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करुन त्यांची सहाय्यक विद्युत निरीक्षक (गट-अ/राजपत्रित) पदावर नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

सबब, श्री. निलेश वामन मदाने, सहाय्यक विद्युत निरीक्षक यांचा दि. १७/०९/२०१२ (म.पू.) पासून सुरु झालेला दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करुन त्यांची सहाय्यक विद्युत निरीक्षक(गट-अ/राजपत्रित) पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत.

**शासन निर्णय:-**

श्री. निलेश वामन मदाने, सहाय्यक विद्युत निरीक्षक हे "सहाय्यक विद्युत निरीक्षक (गट-अ/राजपत्रित)" पदाच्या सेवाप्रवेश नियमातील अटी व शर्तींची तसेच इतर आवश्यक सेवा विषयक बाबींची पूर्तता करीत असल्याने व त्यांनी दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी समाधनकारकरित्या पूर्ण केला असल्याने, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ३९ अपवाद १ (ए) (एक) मधील तरतुदीनुसार त्यांचा "सहाय्यक विद्युत निरीक्षक (गट-अ/राजपत्रित)" पदाचा दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी दि.१६/०९/२०१४ रोजी संपुष्टात आणण्यात येत असून त्यांची सहाय्यक विद्युत निरीक्षक(गट-अ/राजपत्रित) वेतनसंरचना (रु. १५,६००-३९,१००+ग्रेड पे रु. ५,४००) पदावर दि.१६/०९/२०१४ (म.पू.) पासून नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११२९११५९२१२११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallapa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallapa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Bhimashankar Yallapa Manta
Date: 2016.11.29 12:04:55 +05'30'

**( भि.य.मंता )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री(सा.बां.) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, विधानभवन, मुंबई
६) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (सा.बां.वि.), मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा )महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
११) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१), मुंबई
१२) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३) निवासी लेखाधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) मुख्य विद्युत निरीक्षक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू) मुंबई-७१.
१५) श्री. निलेश वामन मदाने, सहाय्यक विद्युत निरीक्षक,(उदवाहन) मुंबई.
१६) अधिक्षक अभियंता, विद्युत निरीक्षक मंडळ मुंबई/नागपूर/औरंगाबाद/पुणे
१७) सर्व कार्यासने ( ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती- ऊर्जा-५